डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत नागपूर कृषि महाविद्यालयाच्या हेरिटेज इमारतीची दुरुस्ती/बळकटीकरणाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : पंदेवि-१३२२/प्र.क्र.९५/७-अे.**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४ मार्च, २०२४.

**संदर्भ**:-१.नागपूर हेरिटेज संवर्धन समितीच्या दि.११.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
२.महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन, पुणे यांच्या दि.१४.०८.२०२३ रोजीच्या ११२ व्या बैठकीचे इतिवृत्त.
३.विद्यापीठ अभियंता, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला यांचे पत्र क्र.विअ/१४११/२०२३, दि.१३.१२.२०२३.

**प्रस्तावना :**

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत कृषि महाविद्यालय, नागपूर हे भारतातील पहिल्या पाच महाविद्यालयांपैकी एक महाविद्यालय असून, सदर महाविद्यालय नागपूर शहरातील महाराजबाग परिसरात ब्रिटीश काळात सन १९०५ ते १९०७ या कालावधीत स्थापन झालेले आहे. महाविद्यालयाच्या स्थापनेस आता ११६ वर्ष पूर्ण झाली असून, सदर कृषि महाविद्यालयाची इमारत ही १५० वर्ष जुनी आहे. या इमारतीचा राज्य शासनाच्या "संरक्षित वास्तू" मध्ये समावेश आहे. सदर इमारतीत विद्यार्थी, शिक्षक तसेच, कर्मचाऱ्यांचा सतत वावर असून, इमारतीची सद्यस्थितीत मोठ्याप्रमाणात दुरावस्था झाली आहे.

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला विद्यापीठाने सादर केलेल्या कृषि महाविद्यालय, नागपूर हेरिटेज इमारतीच्या दुरुस्तीच्या एकूण रु.७.७३ कोटी रकमेच्या प्रस्तावास, विद्यापीठ कार्यकारी परिषदेने ठराव क्र. काप१५/२०२३, दि.२२.०२.२०२३ अन्वये मान्यता प्रदान केली आहे. तसेच, सदर प्रस्तावाला कृषि परिषदेच्या दि.१४.०८.२०२३ रोजी झालेल्या ११२ व्या बैठकीत ठराव क्र.०५/११२/२०२३ अन्वये मान्यता प्राप्त झाली असून, कृषि परिषदेने याबाबत शासनास शिफारस केली आहे. तसेच, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांनी कृषि महाविद्यालय,

नागपूर या पुरातन इमारतीच्या दुरुस्तीचा प्रस्ताव हेरिटेज संवर्धन समिती, नागपूर यांच्या मान्यतेसाठी सादर केला होता, त्यास दि.११.०५.२०२३ रोजी हेरिटेज संवर्धन समितीने मान्यता दिलेली आहे. या सर्व बाबींचा विचार करता, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत नागपूर कृषि महाविद्यालयाच्या हेरिटेज इमारतीच्या संवर्धन, दुरुस्ती/बळकटीकरणाच्या एकूण रु.७७३.०० लाख रक्कमेच्या अंदाजपत्रकीय प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत, नागपूर कृषि महाविद्यालयाच्या हेरिटेज इमारतीच्या संवर्धन, दुरुस्ती/बळकटीकरणाच्या कामासाठी रु.७७३.०० लाख (अक्षरी रु.सात कोटी, त्र्याहत्तर लाख फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास, खालील अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. (बळकटीकरणाच्या व दुरुस्तीच्या कामाचा सविस्तर तपशिल **परिशिष्ट-अ** नुसार राहील.)

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच, विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करूनच काम हाती घ्यावे.

३) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च कृषि व पदुम विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियत व्ययामधून करण्यात यावा.

४) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/ इमा-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

५) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच, सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

६) कृषि महाविद्यालय, नागपूर या महाविद्यालयाच्या ऐतिहासिक इमारतीमध्ये कोणतेही नवीन बदल करता येणार नाहीत.

७) प्रस्तावित दुरुस्तीमुळे ऐतिहासिक वास्तूचे महत्त्व कमी होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

८) प्रस्तावित इमारतीची दुरुस्ती करताना नागपूर हेरिटेज संवर्धन समितीने दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

२. यानिमित्त होणारा खर्च, मागणी क्रमांक डी-३, (००)(०८) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान(कार्यक्रम), ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान २४१५ ००९९ या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदींमधून भागविण्यात यावा.

३. याप्रकरणी महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम, १९८३, परिनियम १९९० आणि लेखासंहिता १९९१ मधील तरतूदींचा, तसेच, प्रचलित शासन आदेश / कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग - पाच अन्वये महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार या शिर्षाखाली, अ.क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ समोरील तरतूदीन्वये, प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार त्या समोरील विहित अटीच्या अधीन राहून, निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३०४१७५१३९१९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2024.03.04 18:02:46 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग यांचे खाजगी सचिव.
२. सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
३. कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
४. कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
५. सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
६. नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
७. विद्यापीठ अभियंता, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
९. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, जि.नागपूर.
११.उपकोषागार अधिकारी, जि.नागपूर.
१२.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१४.जिल्हा लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१६.कार्यासन (इमारती-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
१७.कक्ष अधिकारी २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१८.कार्यासन ७-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ (निवडनस्ती).

कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र : पंदेवि-१३२२/प्र.क्र.९५/७-अे, दि.०४/०३/२०२४ सोबतचे परिशिष्ट

"परिशिष्ट - अ"

**Name of the Department : Agricultural Department**

**NAME OF WORK : - Restoration, Rehabilitation and Repairs to Heritage Building of College of Agriculture Nagpur, Under Dr.Panjabrao Deshmukh Krishi Vidyapeeth, Akola.**

**RECAPITULATION SHEET**

| SR. NO. | Particulars of Items | Area | Unit Rate Norms Rs.Per Sq.m./Meter/LumpSum etc. | Cost Rs. | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | Component Wise | Total |
| ( A ) | ESSENTIAL ITEMS ( Components ) | | | | |
| | (a) Building Proper ( Scope) | | | | |
| 1 | COLLEGE BUILDING | | | | |
| | i) First Floor Roof Area | 2670.00 | 12420.00 | | 33161400.00 |
| | | | | Total ( 1 ) | 33161400.00 |
| | | | | | |
| 2 | Internal Water Supply & Sanitary works | | | | NIL |
| | External Water Supply & Sanitary works including GSR/ESR | | | | NIL |
| | | | | Total ( 2 ) | 0.00 |
| | | | | | |
| 3 | Electrification ( Internal & External) | | LUM SUM | | 22500000.00 |
| | | | | Total ( 3 ) | 22500000.00 |
| | | | Sub Total ( A ) = ( 1 + 2 + 3 ) | | 55661400.00 |
| | | | | | |
| ( B ) | MISCELLANEOUS ITEMS | | | | |
| | i) Compound Wall & Gate ( Rmt ) | | | | NIL |
| | ii) Cocrete Road ( Sq.M. ) | | | | NIL |
| | iii ) Land Development / landscape / Garden etc. | | | | NIL |
| | iv ) pavement | | | | NIL |
| | | | | Sub Total ( B ) = | 0.00 |
| | | | | | |
| ( C ) | OPTIONAL ITEMS | | | | |
| | NMC Approval Charges | | | | NIL |
| | | | | Sub Total ( C ) = | 0.00 |
| | | | | | |
| | | | Project Cost ( P ) = ( A + B + C ) | | 55661400.00 |
| | | | | | |
| ( D ) | PROVISIONS | | | | |
| | | ( I ) Contengencies @ 4 % on ( 1 ) | | | 2226456.00 |
| | | ( II ) G.S.T. @ 18 % on ( P ) | | | 10019052.00 |
| | | ( III ) Price Escalation @ 10 % on ( P ) | | | 5566140.00 |
| | | (IV ) Insurance @ 1% on ( P ) | | | 556614.00 |
| | | ( V ) PMC Charges @ 5 % on ( P )+18% GST | | | 3284022.60 |
| | | | Sub Total ( D ) | | 21652284.60 |
| | | TOTAL COST OF PROJECT ( TPS ) ( 1 + 2 + 3 + B + C + D ) | | | 77313684.60 |
| | | | | Say Rs. | 77300000.00 |

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2024.03.04 18:03:09 +05'30'

( प्रतिभा पाटील )

उप सचिव, महाराष्ट्र शासन